**अधीक्षक अभियंता (स्थापत्य)**
**यांच्या बदल्या / पदस्थापना**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१२१७/प्र.क्र. ६९/सेवा-१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ एप्रिल, २०१७

<u>संदर्भ</u> : सा.बां.विभाग शासन आदेश क्रमांक टीएफएस-१२१६/प्र.क्र. ३१७/५/सेवा-१, दिनांक ३.१०.२०१६

**शासन आदेश :-**

*संदर्भाधीन शासन आदेशान्वये, अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई या पदावर करण्यात आलेले श्री. पी. एस. औटी यांचे पदस्थापना आदेश रद्द करण्यात येत असून, श्री. औटी हे अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई या पदावरच कार्यरत राहतील.*

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. अ. भि. चव्हाण, अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांची पदस्थापना सार्वजनिक सेवेच्या हितार्थ तसेच प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई या प्रतिनियुक्तीच्या पदावर करण्यात येत आहे.

२. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई या पदावर अन्य अधिकाऱ्याची स्वतंत्रपणे नेमणूक करण्यात येईल.

३. श्री. चव्हाण यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, श्री. चव्हाण यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्याचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

५. श्री. चव्हाण यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

६. श्री. चव्हाण यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापना देण्यात आली असून, सदर पदस्थापना ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

७. श्री. चव्हाण यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२४१७३७३०६५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2017.04.24 17:38:44 +05'30'

**( मृ.सं.देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर/ विशेष प्रकल्प, मुंबई/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
६. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मुंबई,
७. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
१०. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३. श्री. अ. भि. चव्हाण, अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,
१४. श्री. पी. एस. औटी, अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१७. मा. मंत्री, परिवहन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१८. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१९. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,

२०. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२१. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२२. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. सार्वजनिक बांधकाम विभाग / आस्था-१, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
२४. निवडनस्ती.